**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता समग्र शिक्षा अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेकरीता निधी वितरण.**
**केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २२०२ आय ६४८)**
**राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२०२ आय ६५७)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/ प्र.क्र. ०४ / कार्या-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२२.

वाचा : -

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.७-४/२०२१-IS.१२ (ST), दि. २८.०३.२०२१.
३) शालेय शिक्षण विभाग, नस्ती क्र.समग्र-२०२१/प्र.क्र.१११/भाग-३/एस.डी.१.

प्रस्तावना :-

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत शालेय शिक्षण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या समग्र शिक्षा अभियान या योजनेसाठी प्राप्त झालेला केंद्र हिस्सा रु.५२३४.७२ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.३४८९.८१३३४ लाख इतका निधी सन २०२१-२२ च्या आर्थिक तरतुदींतून वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर प्रस्तावास वित्त विभागाने मान्यता दिली आहे. वित्त विभागाच्या सहमतीस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण खालील समग्र शिक्षा अभियान या योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून केंद्र हिस्सा रु.५२३४.७२ लाख व समरुप राज्य हिस्सा रु.३४८९.८१३३४ लाख असा एकूण रु.८७२४.५३३३४ लाख इतका निधी खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र /राज्य हिस्सा | उद्दिष्ट | सन २०२१-२२ करीता सुधारीत अंदाज | आतापर्यंत वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| समग्र शिक्षा अभियान | २२०२ आय ६४८ केंद्र हिस्सा ( ६० % ) | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १८३७५.०० | २८००.१९ | ५२३४.७२ |
| | २२०२ आय ६५७ राज्य हिस्सा (४० %) | | ७२९९.९० | १८६६.७९ | ३४८९.८१३३४ |
| **एकूण** | | | **२५६७४.९०** | **४६६६.९८** | **८७२४.५३३३४** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.८७२४.४३३३४ लाख (अक्षरी रुपये सत्याऐंशी कोटी चोवीस लाख त्रेपन्न हजार तीनशे चौतीस फक्त)** इतका निधी प्रशासकिय विभागप्रमुख म्हणून अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. त्या अनुषंगाने झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतुन फक्त अनुसूचित जमातीच्या लाभार्थ्यांना लाभ मिळेल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित विभागाची राहील. यामध्ये प्रामुख्याने आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याच्या योजनेसह वैयक्तिक लाभाच्या योजना राबविता येतील. मात्र आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४७४/व्यय-१४, दि.३१.०३.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६३४१५२२२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAVINDRA
D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.03.31 18:37:11 +05'30'

**( रविंद्र दि. औटे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक/ नागपूर/ अमरावती/ठाणे.
७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
८. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
१०. वित्त विभाग ( अर्थोपाय / अर्थ-१९ / व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२
११. निवडनस्ती, (कार्यासन-०६), आदिवासी विकास विभाग.